**प्रशासकीय मान्यता**

सन २०१९-२० या वित्तीय वर्षात जिल्हा खनिज प्रतिष्ठान, यवतमाळ यांच्याकडून मंजूर अनुदानातून संस्थेकरिता यंत्रसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता.

---

श्री. वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, यवतमाळ

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक: व्हीएचवाय-२०१९/प्र.क्र. २४९/प्रशा-१**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,

दिनांक : ०९ जानेवारी, २०२०

**वाचा** :

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.

४) जिल्हाधिकारी यवतमाळ तथा सदस्य सचिव जिल्हा खनिज प्रतिष्ठान, यवतमाळ यांचे पत्र क्र.कावी/खनिकर्म/भौ.मा.प्र.सहा/२०१९/३१/ दि.१६.०१.२०१९ रोजीचे पत्र.

५) संचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र : संवैशिवसंशावैम/वरुय/ जिखप्रयवतमाळ२०१९/९७८२/म१/यंसाख/, दि. १५.०६.२०१९.

**शासन निर्णय :-**

श्री. वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, यवतमाळ या संस्थेस संदर्भाधीन दिनांक १६.०१.२०१९ च्या पत्रान्वये सन २०१९-२० या आर्थिक वर्षात जिल्हा खनिज प्रतिष्ठान, यवतमाळ मार्फत मंजूर अनुदानातून खालील तक्त्यात नमूद रुपये ६७,०३,९१२/- (अक्षरी रुपये सदुसष्ट लक्ष तीन हजार नऊशे बारा फक्त) ची यंत्रसामुग्री एकलस्त्रोतामार्फत खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | यंत्राचे नाव | आवश्यक नग संख्या | प्रती नग किंमत (रु ) | एकूण किंमत |
|---|---|---|---|---|
| १) | ३६ सिम लॅप्रोस्कोपीक अर्गोनॉमिक प्रोब | ०२ सेट | १२,२५,७४८/- | २४,५१,४९६/- |
| २) | एअर सिल सिस्टीम विथ ॲक्सेसरीज | ०१ | ४२,५२,४१६/- | ४२,५२,४१६/- |
| | | | एकूण | ६७,०३,९१२/- |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता जिल्हा खनिज प्रतिष्ठान, यवतमाळ यांच्यामार्फत सदर संस्थेस मंजूर असलेल्या अनुदानातून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री ही एकलस्त्रोत स्वरूपाची असल्याची खातरजमा संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन , मुंबई व संबंधित संस्थेतील सक्षम अधिकारी यांनी केलेली आहे. याबाबत भविष्यात काही बाब उद्भवल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित संस्था व संचालनालयाची राहिल.

३. सदर यंत्रसामुग्री एकलस्त्रोत (प्रोप्रायटरी) स्वरुपाचे आहे, असे संबंधितांनी प्रमाणित केलेले आहे, सबब सदर यंत्रसामुग्री एकलस्त्रोत (प्रोपायटरी) स्वरूपाची आहे किंवा कसे ही बाब तसेच याबाबतचे अद्यावत व विहीत प्रमाणपत्र तपासून हाफकीन महामंडळाने सदर यंत्रसामुग्री खरेदी करणेबाबत कार्यवाही करावी.

४. मुख्य यंत्र व त्याचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

५. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फामास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

६. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

७. सदर यंत्रसामुग्रीसाठी कोणतेही नवीन बांधकाम किंवा पदनिर्मीतीची आवश्यकता नाही.

८. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

९. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या

शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

२. या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्त्यात नमूद केल्यानुसार येणारा यंत्रनिहाय खर्च सदर संस्थेस जिल्हा खनिज प्रतिष्ठान, यवतमाळ यांच्याकडून मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१०९१२५०४५६२१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ARUN MURLIDHAR RAO DAHALE

Digitally signed by ARUN MURLIDHARRAO DAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, postalCode=400032, street=MANTRALAYA ,MUMBAI, serialNumber=30df743755280cf26ce97ec0978235f63f80f0bc4317129bf381eb48778f2e3d, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ARUN MURLIDHARRAO DAHALE
Date: 2020.01.09 15:34:32 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, नागपूर.
२. व्यवस्थापकीय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि., मुंबई.
३. जिल्हाधिकारी, जिल्हा खनिज प्रतिष्ठान, जिल्हाधिकारी कार्यालय, यवतमाळ.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. अधिष्ठाता, श्री. वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, यवतमाळ.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, यवतमाळ.
७. निवडनस्ती (प्रशा-१).